केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - या योजनेंतर्गत वाणिज्यिक पिके, कापूस व ऊस यांकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करणेबाबत. (लेखाशिर्ष (२४०१ A५९३) (केंद्र हिस्सा) व (लेखाशिर्ष २४०१ A६०१) (राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र.७ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ जानेवारी, २०२०.

**वाचा -**

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
३) कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. २-९/२०१५-CU-IV दि. ०९.०४.२०१९.
४) कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.१-३/२०१९-२०/NFSM-१/२७२१, दि. २९.१०.२०१९.
५) कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ३-१०/२०१९/NFSM, दि. २०.११.२०१९.
६) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. राअसु-२०२० / प्र. क्र.०६/ ४-अे.

**शासन निर्णय-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - वाणिज्यिक पिके (कापूस व ऊस ) अंतर्गत मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) आदिवासी उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (२५) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - व्यापारी पिके - ऊस (केंद्र हिस्सा) (२४०१ A५९३ ), ३३- अर्थसहाय्य खाली रु. २६.०६ लाख तर त्यास समरुप राज्य हिश्याकरिता (०१) (२६) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - व्यापारी पिके - ऊस (राज्य हिस्सा ) (२४०१ A६०१ ) याखाली रु. १७.३७ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ६ येथील प्रस्तावास अनुसरुन उपरोक्त योजनेकरीता सन २०१९-२० साठी केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेल्या निधीपैकी ऊस (केंद्र हिस्सा) (२४०१ A५९३ ), ३३- अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. २.२८ लाख तसेच ऊस (राज्य हिस्सा) (२४०१ A६०१ ) या लेखाशिर्षाखाली रु.१.५२ लाख असा एकूण ३.८० लाख ( अक्षरी रुपये तीन लाख ऐंशी हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषी), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रकरणी नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.४३२/ अर्थोपाय, दि. ०७.१२.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१५२६०२८७२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a9129 6205b9a87463f831a2beea0be5cb381a34e 8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.01.27 13:22:32 +05'30'

**( किरण कि. पवार )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त ( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग